**महाराष्ट्र शासन**

क्र. सीएसएल २०१७/ प्र.क्र. ७/ १३-स
सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - ०४ फेब्रुवारी, २०१७

वाचा- १. महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३कक.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, पुणे यांचे पत्र क्र. रासनिप्रा/कक्ष ४/ सह.संस्था/निवडणुक स्थगिती/५२९/२०१७, दि. ३०.०१.२०१७

## आदेश

ज्याअर्थी, राज्यातील स्थानिक प्राधिकरणाच्या निवडणूकांचा कार्यक्रम राज्य निवडणुक आयोगाने दि.११/१/२०१७ च्या प्रसिध्दिपत्रकान्वये जाहीर केला आहे. त्याच कालावधीत राज्य सहकारी संस्था निवडणुक प्राधिकरणाने राज्यातील सहकारी संस्थांच्या निवडणूकीचा कार्यक्रम जाहीर केला असून, काही सहकारी संस्थांमध्ये निवडणूक प्रक्रिया सुरु झाली आहे;आणि

ज्याअर्थी, राज्यातील स्थानिक प्राधिकरणाची व सहकारी संस्थांची निवडणुक प्रक्रिया एकाच कालावधीत येत असल्यामुळे यासंदर्भात प्रशासन व सभासदांची गैरसोय होण्याची शक्यता आहे;

त्याअर्थी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३कक मधील तरतूदीन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारानुसार राज्य निवडणुक आयोगामार्फत राज्यातील स्थानिक प्राधिकरणाच्या निवडणूकांच्या जाहीर झालेल्या कार्यक्रमामुळे, सहकारी संस्थांच्या निवडणुका घेण्यास येणा-या अडचणी विचारात घेवून, राज्यातील ज्या जिल्ह्यात स्थानिक प्राधिकरणाच्या निवडणूकांचा कार्यक्रम जाहीर झाला आहे, त्या जिल्ह्यातील 'अ' व 'ब' वर्गातील सहकारी संस्थांच्या निवडणुका घेण्याबाबत, न्यायालयाने निश्चित आदेश दिले आहेत अशा संस्था वगळून, 'अ' व 'ब ' वर्गातील सहकारी संस्थांचा निवडणूक कार्यक्रम ज्या टप्प्यापर्यंत पूर्ण झाला आहे, त्या टप्प्यापासून या आदेशाच्या दिनांकापासून दोन महिन्यापर्यत लोकहितार्थ पुढे ढकलण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२०७११४४२८०७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Anil Jayaram Choudhary

Digitally signed by Anil Jayaram Choudhary
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, serialNumber=d124ae9bbd15bed87dbd08ef779cf1b85a4020339eb1c2ef0e112fb67063011c, cn=Anil Jayaram Choudhary
Date: 2017.02.07 11:46:50 +05'30'

(अनिल ज. चौधरी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे. यांना विनंती करण्यात येते की, सदर आदेश ज्या 'अ' व 'ब ' वर्गातील सहकारी संस्थांचा निवडणूक कार्यक्रम जाहीर झाला आहे त्या सहकारी संस्थांच्या निवडणुक अधिका-यांना प्रत निर्गमित करण्यात यावी.
३. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, साखर संकुल, शिवाजी नगर,पुणे
४. संचालक, वस्त्रोद्योग, जुने सचिवालय, जी.पी.ओ. सिव्हील लाईन समोर, नागपूर
५. अपर मुख्य सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. निवडनस्ती.